पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन उमेदवारांना समांतर आरक्षण लागू करणे व वयोमर्यादेत सवलत देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक: पअंक-१००९/प्र.क्र. २००/२००९/१६-अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑक्टोबर, २००९

वाचा :- (१) शा.नि.,सा.प्र.वि.क्र : पअंक १०९७/१७९३/प्र क्र ४/९८/१६-अ, दि.१९.३.१९९८.
(२) शा. नि.,सा.प्र.वि. क्र: पअंक १००५/प्र.क्र.३६/०५/१६-अ, दि. २६.८.२००५.
(३) शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.:न्याप्र-१००३/९९/प्र.क्र२/०३/(भाग-२)/१६-अ, दि. २५.१०.२००५.

**प्रस्तावना :**

वरील संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय, दिनांक १९.३.१९९८ अन्वये "सुशिक्षित बेरोजगाराना आर्थिक सहाय्य" या योजनेअंतर्गत शासकीय कार्यालयात काम केलेल्या पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचाऱ्यांना शासन सेवा प्रवेशासाठी काही सवलती दिल्या आहेत.

संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय, दिनांक २६.८.२००५ अन्वये सदर योजनेत तीन वर्षे काम केलेल्या व रोजगार मार्गदर्शन केंद्रामध्ये या तीन वर्षाच्या अनुभवाची नोंद केलेल्या सर्व अंशकालीन पदवीधर/पदविकाधारक उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेतील नियुक्त्यांमध्ये उच्च वयोमर्यादेत ४५ वर्षापर्यत शिथिलता देण्याची सवलत दिलेली आहे.

आता वरील पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन उमेदवारांना समांतर आरक्षण लागू करण्याची व वयोमर्यादेत आणखी सवलत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"सुशिक्षित बेरोजगारांना अर्थसहाय्य" या योजनेअंतर्गत शासकीय कार्यालयामध्ये तीन वर्षापर्यत दरमहा मानधनावर काम केलेल्या व रोजगार मार्गदर्शन केंद्रामध्ये या अनुभवाची नोंद केलेल्या पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन उमेदवारांना शासकीय/ निमशासकीय सेवेतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील गट-क पदावरील सरळ सेवेने करावयाच्या नियुक्त्यांसाठी १० टक्के समांतर आरक्षण लागू करण्यात येत आहे व त्यांना सध्याच्या ४५ वर्षे वयोमर्यादेत आणखी १ वर्षाने वाढ करुन सदर सवलत ४६ वर्षापर्यत देण्यात येत आहे."

२. सदर पदभरती मा. सर्वोच्च न्यायालय व महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या सूचना विचारात घेऊन निर्गमित केलेल्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या शासन परिपत्रक, दिनांक २५.१०.२००५ मधील मार्गदर्शक तत्त्वानुसारच करणे बंधनकारक आहे.

३. हा शासन निर्णय शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे, नगरपालिका/ महानगरपालिका, जिल्हा परिषदा, शासकीय अनुदानप्राप्त संस्था आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे, अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांना लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९१०२७१६२३३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दि. रा. डिंगळे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान सभा) विधानभवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद) विधानभवन, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, निवड नस्ती. * (पत्राने)